# गमड्रॉपची शर्यत

## लेखक: व्हॉल बिरो

मराठी अनुवाद: सुशील मेन्सन



जून महिन्यातील एके सकाळी मोठ्या मैदानात एक विचित्र दृश्य दिसले. तिथे जुन्या काळातील मोटारगाड्यांची वर्षातील सर्वात मोठी शर्यत सुरू होणार होती. अशा सुंदर सुंदर मोटारगाड्या सहसा एकत्रितपणे पाहायला मिळत नसत. प्रत्येक मोटारीवर एक क्रंमांक टाकला होता.

क्रमांक 1 *एल्व्हीस डक्-बक्*, क्रमांक 2 *मॉरिस बुलनोस*, क्रमांक 3 *मॉडेल टी-फोर्ड*, क्रंमाक 4 *स्पीड सिक्स बेंटले*, क्रमांक 5 दोन सीटांची *डॉड्ज*, क्रमांक 6 *अल्फा-रोमिओ*, क्रमांक 7 *हम्बर*, क्रमांक 8 *रेनॉल्ट.....*





आणि हो, एक निळी मोटार. या मोटारीचे छत काळे होते, भोंगा पितळेचा होता आणि तिचा क्रमांक होता 9. ही 1926 सालची ऑस्टीन क्लिफ्टन मोटार होती. तिचे नाव होते *गमड्रॉप.* बिल मॅकरन हा या गाडीचा ड्रायव्हर होता. बिलची पत्नी सॅलीसुद्धा त्याच्यासोबत होती. ती शर्यतीत गमड्रॉपची मार्गदर्शक होती, बिलला मार्ग दाखवण्याचे काम करणार होती.



"ऐका," आयोजकांनी माईकवर सूचना दिली. सर्व लोक शांत झाले. "सर्व सूचनांचे नीट पालन करा. वाटेतील दिशा दर्शवणाऱ्या खुणांकडे लक्ष ठेवा. तुम्ही योग्य मार्गाने जात आहात, याची खात्री करून घ्या. नाहीतर, गुण गमवाल. मोटारगाड्या एक-एक मिनिटांच्या अंतराने सोडण्यात येतील. तुम्ही साठ मैलांचे अंतर कापून *हाइड हेथ* येथे पोहोचल्यावर शर्यत संपेल. चार वाजता जी पहिली कार तिथे पोहोचेल तिला विजेती घोषित करण्यात येईल. आणि हो, कुठे हरवू नका." शेवटी, गमड्रॉप मोटारीची निघण्याची पाळी आली तेव्हा बिलने कर्णा (हॉर्न) वाजवला. सॅलीच्या सूचनांनुसार काळजीपूर्वक योग्य रस्ता धरून त्याने दहा मैल अंतर कापले. पण पुढे समोर दोन वळणे आली. "आता कोणत्या मार्गाने जायचं?" बिलने विचारले.





"या रस्त्याने जा," रस्त्याकडेला उभा असलेला एक तरूण मुलगा म्हणाला.
"आभार!" बिल म्हणाला आणि त्याने मोटार त्या उंचसखल रस्त्यावर वळवली. त्या रस्त्यावर ठिकठिकाणी वळणे होती. कुठे रस्त्याला तीव्र उतार होता तर कुठे तो अरुंद होता. पुढे एका फाटकापाशी तर रस्ताच संपला होता.
"आपण चुकीच्या रस्त्याने आलो असं वाटतंय," सॅली म्हणाली.
"त्या मुलाने आपल्याला मूर्ख बनवलं. वळून योग्य मार्ग शोधण्याशिवाय पर्याय नाही," बिल वैतागत म्हणाला.




तेवढ्यात, त्यांना एक मंद हॉर्न ऐकू आला. बिलने गमड्रॉप थांबवली. रस्त्यावर एक मूल खेळण्यातील मोटारीत बसले होते. ते रडत होते. “मी मोटार चालवून दमलोय. मला घरही सापडत नाहिये. माझं नाव पीटर आहे आणि मी *मॅपल ट्री* शेतात राहातो.”

“ते बघ, रस्त्याच्या शेवटी शेत आहे तुमचं,” सॅली म्हणाली. “मघाशी येताना मी ते शेत पाहिलं होतं.”

“ठीक आहे,” बिल त्या मुलाला म्हणाला, “आम्ही तुझी मोटार आमच्या गमड्रॉपमध्ये ठेवतो आणि मग तुला तुझ्या घरी सोडतो.”

पीटरला बघून मेपल ट्री शेतातील गायी हंबरू लागल्या आणि गाढव रेकू लागले. पीटर सापडल्यामुळे शेतकरी आनंदला. त्याने बिलला गमड्रॉपमध्ये भरण्यासाठी इंधन दिले आणि कॉफी पिऊन जाण्याचा आग्रह केला.

“आभारी आहे, पण आम्ही थांबू शकत नाही. आम्हाला आमचा रस्ता शोधून काढायचाय,” बिल म्हणाला.

मग त्यांनी रस्ता शोधण्यासाठी डावी, उजवी वळणे घेत गमड्रॉपला कित्येक मैल पळवत नेले. अचानक, त्यांना घोड्याच्या खिंकाळण्याचा आवाज आला. एका मोटारीला जोडलेल्या ट्रेलरमध्ये त्यांना एक घोडा दिसला. “आमची मोटार बंद पडलीय,” पायघोळ पँट घातलेली एक मुलगी म्हणाली, “आणि आम्हाला घोड्यांच्या स्पर्धेसाठी जिमखान्यात वेळेवर पोहोचायचंय. तुम्ही आम्हाला सोडाल का तिथे?”



“लवकर गाडीत बस. आम्ही तुझी ट्रेलर आमच्या गमड्रॉपला बांधून खेचत नेतो आणि तुला वेळेवर जिमखान्यात पोहोचवतो,” बिल म्हणाला.

आणि ते अगदी वेळेत जिमखान्यावर पोहोचले. घोड्यांची स्पर्धा सुरू होण्याच्या बेतात होती. मुलगी पट्कन आपल्या घोड्यावर स्वार झाली. तिच्या घोड्याने कमाल केली आणि स्पर्धा जिंकली.

"तुम्ही मोठ्या मनाचे आहात," मुलीचे वडील बिल आणि सॅलीला म्हणाले. आपली कृतज्ञता दर्शवण्यासाठी त्यांनी बिलला गमड्रॉपसाठी स्पार्क-प्लगचा संच दिला.
त्यांनी बिल आणि सॅलीला संपूर्ण स्पर्धा बघून जाण्याचा आग्रह केला.
"आभारी आहे, पण आम्हाला निघायला हवं. आम्हाला आमचा रस्ता शोधायचाय," बिल त्यांचा निरोप घेत म्हणाला.

पुन्हा त्यांनी रस्ता शोधण्यासाठी डावी, उजवी वळणे घेत, गमड्रॉपला कित्येक मैल पळवत नेले. मग ते एका छोट्याशा शहरात पोहोचले. तिथे सर्वत्र घंटांचा आवाज खणखणत होता....डिंग-डाँग-डिंग-डाँग!



तेथील रस्ते गर्दीने फूलून गेले होते आणि विचित्र दिसणाऱ्या गाड्या अतिशय धीम्या गतीने चालत होत्या. ती कार्निवल सणानिमित्त निघालेली मिरवणूक होती. गमड्रॉपला वळण घेण्यासाठीपुरतीही जागा नव्हती. त्यामुळे गमड्रॉपलाही गर्दीसोबत सावकाश चालावे लागले.

तेवढ्यात एक माणूस धावत-पळत गमड्रॉपपाशी आला. “साहेब, एक मदत कराल? शहराच्या माननीय महापौरांची गाडी खराब झालीय. त्यांना महत्त्वाच्या कामासाठी टाऊन हॉलला जायचंय. तुम्ही तुमच्या या सुंदर गाडीतून त्यांना तिथे पोहोचवाल?”

“या जुन्या सुंदर गमड्रॉपमधून प्रवास करण्याची मजा काही औरच!” महापौर म्हणाले. “तरूण असताना माझ्याकडे अशीच गाडी होती.”
गमड्रॉप नाच-गाणी करणाऱ्या गर्दीतून वाट काढत पुढे गेली.

“तुम्हा दोघांचे खूप आभार,” टाऊन हॉलला पोहोचल्यावर महापौर म्हणाले. त्यांनी खुश होऊन बिलला आपल्या जुन्या गमड्रॉप गाडीची माहिती पुस्तिका भेट दिली. त्यांनी दोघांना जेवून जाण्याचा आग्रहही केला. “आभारी आहे, पण आम्हाला निघायला हवं. आम्हाला आमचा रस्ता शोधायचाय,” बिल त्यांचा निरोप घेत म्हणाला.

त्यांनी रस्ता शोधण्यासाठी डावी, उजवी वळणे घेत, गमड्रॉपला कित्येक मैल पळवत नेले. अचानक, त्यांना थांबावे लागले.

एका ट्रॅक्टरने रस्ता अडवला होता. “कृपया, मला मदत करा.” ट्रॅक्टरचे ड्रायव्हर, मिस्टर वुडली म्हणाले. “मी बाजारात जात होतो. पण ट्रॅक्टरमागे लावलेल्या ट्रेलरचं दार उघडलं गेलं आणि माझी दहा डुकराची पिल्लं त्यातून बाहेर निसटली. ती नक्कीच पुन्हा आमच्या शेतात गेली असणार. त्यांना परत आणायला मला पुन्हा माझ्या शेतात जावं लागेल.”

मिस्टर वुडली गमड्रॉपच्या मागच्या सीटवर बसले. बिल आणि सॅली त्यांना त्यांच्या शेतावर घेऊन गेले.

मिस्टर वुडली यांना चार पिल्ले शेतातील तळ्यात सापडली.





सॅलीला तीन पिल्ले शेडमध्ये सापडली.

बिलला दोन पिल्ले आंघोळीच्या टबमध्ये सापडली.





उरलेले पिल्लू लाकडी पिंपात सापडले.

सर्व पिल्लांना त्यांनी गमड्रॉपमध्ये ठेवले आणि ते ट्रेलरजवळ परतले. डुकराची पिल्ले ओरडू लागली.

“पिल्लांना इथे आणल्याबद्दल तुमचे आभार,” मिस्टर वुडली म्हणाले.

कृतज्ञता दर्शवण्यासाठी मिस्टर वुडली यांनी बिलला गमड्रॉपसाठी जुन्या अवजारांचा एक संच दिला.

“आभारी आहे, मिस्टर वुडली. आता आम्हाला निघायला हवं. आम्हाला आमचा रस्ता शोधायचाय,” बिल त्यांचा निरोप घेत म्हणाला.

खूप उशीर झाला होता. रस्ता शोधण्यासाठी डावी, उजवी वळणे घेत ते गमड्रॉपला पळवू लागले. मग एके ठिकाणी समोर रस्त्याला दोन वळणे दिसली. एका वळणावर खुणेचा खांब होता. एक रस्ता हाइड हेथला जात होता. तिथेच तर शर्यत संपणार होती.

“शेवटी, आपल्याला रस्ता सापडलाच,” सॅली बिलला म्हणाली.

तेवढ्यात, त्यांना मागे काही आवाज आला. वळून पाहिल्यावर त्यांना काळ्या धुराचे लोट दिसले. “गवताच्या गंजीला आग लागलीय वाटतं. शेतावर कुणीच कसं दिसत नाही?” बिल ओरडला.




एकच पर्याय होता. बिलने गमड्रॉप वळवली आणि अग्निशमन केंद्राला कळवण्यासाठी तो पुन्हा शहराकडे जाऊ लागला.

क्लँग-क्लँग, क्लँग-क्लँग! अग्निशमन केंद्राची गाडी घंटेचा आवाज करत गमड्रॉपच्या मागेमागे धावू लागली. गवताची गंजी एव्हाना बेफामपणे जळू लागली होती. पण तेथील घराच्या इमारतीला अद्याप त्याची झळ लागली नव्हती. अग्निशामक जवानांनी आपल्या गाडीतील पाण्याचे पाईप मोकळे केले आणि थोड्याच वेळात आग विझवली.



तेवढ्यातच, शेताचा मालक परतला. घडलेली घटना कळताच, त्याने बिलचे खूप आभार मानले आणि बिलला गमड्रॉपसाठी इंधनाने भरलेला एक डबा दिला. “खूप आभार,” बिल म्हणाला. मग तो सॅलीकडे वळून म्हणाला, “आता आपण निघू आणि शर्यत पूर्ण करु.”






ते फारतर दोनच मैल पुढे गेले असावेत. एका मोटरबाइकचा गुरगुर आवाज मोठा होत गेला. मोटरबाइक वेगाने त्यांच्या दिशेने आली. गमड्रॉप पाहून बाइकस्वाराने करकचून ब्रेक दाबले. बाइक अचानक डावीकडे वळून झोकांडी खात घसरली. तिच्या मागे ठेवलेले एक पुडके खाली पडले.

पण बाइकस्वाराने बाइक तात्काळ सावरली. गमड्रॉपकडे तीक्ष्ण नजर टाकत तो तसाच वेगाने बाइक गुरगुरत पुढे निघून गेला.

“हा तोच लांब केसांचा मुलगा वाटतं, ज्याने आपल्याला सकाळी मूर्ख बनवलं. त्याचं पुडकं पडलेलं दिसतंय.”

तोवर बाइक खूप पुढे निघून गेली होती, दिसेनाशी झाली होती. बिलने पुडके उचलून मागच्या सीटवर ठेवले. मग ते पुन्हा शर्यतीच्या ठिकाणी निघाले आणि एकदाचे हाइड हेथला पोहोचले.





सर्व गाड्या अगोदरच तिथे पोहोचल्या होत्या. गमड्रॉप सर्वात शेवटी पोहोचली. कारण बिल आणि सॅली रस्ता चुकले होते.
“ऐका,” आयोजक माइकवर बोलू लागले,
“सभ्य स्त्री-पुरुषहो, शर्यत संपलेली आहे, पण आम्ही बक्षीस देऊ शकत नाही. कारण बक्षीसे चोरीला गेली आहेत.”
“चोरीला गेली!” बिल ओरडला. त्याला काही आठवले. त्याने गमड्रॉपमधून पुडके काढून उघडले. त्यात तीन चांदीचे कप होते.



“अरे व्वा!” आयोजकांना आश्चर्याचा धक्काच बसला. “चोर पराभूत झालेला आहे. आता आपण बक्षीसे वाटू शकतो. गमड्रॉपला चांदीचा कप नाही मिळाला तरी मी त्याला इंजिन सुरू करायचा पितळेचा दांडा विशेष बक्षीस म्हणून देत आहे. गमड्रॉपमुळेच आपल्याला बक्षीसं परत मिळाली म्हणून.”
सगळ्यांनी गमड्रॉपसाठी टाळ्या वाजवल्या. सगळ्या गाड्यांचे हॉर्न वाजू लागले.

तर अशा प्रकारे शर्यत संपली. गमड्रॉप शेवटी पोहोचली. तरीही लोकांनी तिचे खूप कौतुक केले. ती रस्ता चुकली तरी तिने *एका लहान मुलाला मदत केली,*



*एका घोडेस्वार मुलीला मदत केली,*



*महापौरांना वेळेवर नेले,*





आणि *डुकराची दहा पिल्ले पकडण्यात शेतकऱ्याची मदत केली.*



तिने आग विझवण्यातही मदत केली आणि चांदीचे कपसुद्धा शोधले. तिने स्वत: काही बक्षीस जिंकले नाही, पण त्यापेक्षा मोठे बक्षीस म्हणजे लोकांची मने जिंकली.

*तेलाचा डबा*



*स्पार्किंग-प्लग*



*गमड्रॉपची ड्रायव्हींग पुस्तिका*



*अवजारांचा संच*





*इंधनाने भरलेला डबा*



*पितळेचं स्टार्ट हँडल*



शर्यत संपल्यावर सर्वाधिक आनंदी मोटार होती, गमड्रॉप!

**समाप्त**